**रिट याचिका क्र. ७४९६/२००२ मध्ये दाखल करण्यात आलेल्या समझोता करारनाम्याशी संबंधित बाबींची चौकशी करण्याबाबत..**

## महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
## शासन आदेश क्रमांकः एस ३०/जमीन २६१४/प्र.क्र.१०५/ज-३,

३२ वा मजला, सेंटर वन इमारत,
जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई : ४०० ००५.
दिनांक : २१ ऑक्टोबर, २०१४.

## आदेश

**प्रस्तावना**

मे.दर्यानानी (इंडोसायगाव) कंन्स्ट्रक्शन कंपनी प्रा.लि. यांनी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांच्या दि.२०.११.२००२ च्या आदेशाविरुध्द मा.मुंबई उच्च न्यायालयात रिट याचिका क्र.७४९६/२००२ दाखल केली होती. मा.उच्च न्यायालयासमोर दि.१७.०३.२०११ रोजी सुनावणीच्या वेळेस, वादीच्या वकीलांनी व सहायक सरकारी वकीलांनी समझोता करार दाखल केल्याने सदरील याचिका मागे घेण्यास मा. मुंबई उच्च न्यायालयाने वादीला परवानगी देवून याचिका निकाली काढण्यात आली.

०२. उपरोक्त आदेशाविरुध्द श्री.ऑस्टिन जी.मेंडीस यांनी राज्यशासन व इतर यांच्या विरुध्द मा.मुंबई उच्च न्यायालयात रिट याचिका क्र. २६८४/२०१४ दाखल केली आहे. सदर याचिकेमध्ये असा आक्षेप घेण्यात आला आहे की, याचिका क्र.७४९६/२००२ मधील प्रतिवादी क्र. ५ ते ७ यांना अंधारात ठेऊन व ते मा.मुंबई उच्च न्यायालयात हजर नसतांना दि. १७ मार्च, २०११ च्या समझोता कराराच्या आधारे सदरील याचिका मागे घेतली होती. याबाबत मा.मुंबई उच्च न्यायालयाने शासनास बाजू मांडण्याचे निदेश दिले होते व त्यासंदर्भात जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा यांनी दि.०८.०८.२०१४ रोजी प्रतिज्ञापत्र दाखल केले होते. दि. १० ऑक्टोबर, २०१४ रोजी झालेल्या सुनावणीत याचिका क्रमांक ७४९६/२००२ मध्ये कोणत्या परिस्थितीत समझोता करारानामा दाखल करण्यात आला व त्याच्याशी निगडीत इतर बाबींची विभागीय आयुक्त, कोकण विभाग व सह सचिव विधी व न्याय विभाग, मंत्रालय यांचा समावेश असलेल्या चौकशी समितीमार्फत चौकशी करण्यात येईल, असे मा.उच्च न्यायालयात शासनाने सादर केलेल्या प्रतिज्ञापत्रात नमूद केल्यानुसार शासन आता खालीलप्रमाणे आदेश देत आहे:-

०३. याचिका क्र. ७४९६/२००२ मध्ये दि.१७.०३.२०११ चा समझोता करारनामा तयार करणे, दाखल करणे व त्यामधील तरतूदी या संदर्भात उक्त याचिकेमध्ये करण्यात आलेले आरोप व दाव्याची चौकशी करण्याकरीता, श्री.राधेश्याम मोपलवार, विभागीय आयुक्त, कोकण विभाग व श्री.वि.ग्या.बिष्ट, विधी सल्लागार-नि-सहसचिव, विधी व न्याय विभाग यांचा समावेश असलेली चौकशी समिती या आदेशाद्वारे

गठीत करण्यात येत आहे. समितीचे कामकाज विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांच्या मुंबई येथील कार्यालयात होईल. सदर चौकशी समिती खालील बाबींची चौकशी करील :-

१) मे.दर्यानानी (इंडोसायगाव) कंस्ट्रक्शन कंपनी यांनी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांच्या दि. २०.११.२००२ च्या आदेशाविरुध्द मा.मुंबई उच्च न्यायालयात दाखल केलेली रिट याचिका क्र.७४९६/२००२ मध्ये दि. १७ मार्च, २०११ रोजी मा.मुंबई उच्च न्यायालयासमोर समझोता कराराची कोणत्या परिस्थितीत दाखल करण्यात आला व संबंधित सहायक सरकारी वकील (श्री.आर.एन.पाटणे) यांना त्या संदर्भात काही सूचना देण्यात आल्या होत्या काय आणि देण्यात आल्या असल्यास, कोणत्या सूचना ?

२) रिट याचिका क्र.२६८४/२०१४ मध्ये दि.०८ ऑगस्ट, २०१४ रोजी दाखल केलेले प्रतिज्ञापत्र कोणत्या परिस्थितीत दाखल करण्यात आले.

०४ शासन असेही आदेश देत आहे की, या समितीस उपरोक्त बाबींशी संबंधित विद्यमान तसेच तत्कालीन शासकीय अधिकारी, संबंधित विद्यमान तसेच तत्कालीन सहायक सरकारी वकील यांना चौकशीसाठी बोलविण्याचे व माहिती घेण्याचे अधिकार राहतील.

०५. मा.मुंबई उच्च न्यायालयाचे निदेश विचारात घेऊन उक्त समितीने त्यांच्याकडे सोपविलेल्या बाबींची चौकशी करुन चौकशी अहवाल शासनास यथाशिघ्र सादर करावा.

०६ सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०२११११८१९०२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Narayan Kale

Digitally signed by Madhav Narayan Kale
DN: CN = Madhav Narayan Kale, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.10.21 19:31:38 +05'30'

**( माधव काळे )**
शासनाचे उप सचिव

प्रत,

१. प्र.स.तथा विधी परामर्शी, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई :३२.
२. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
३. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर,
४. सरकारी वकील, मा.मुंबई उच्च न्यायालय, (अपील शाखा) मुंबई.
५. निवडनस्ती/ज-३, महसूल व वन विभाग, मुंबई.